जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र, सिंधुदुर्ग येथे व्यवसाय मार्गदर्शन व समुपदेशन केंद्र स्थापित करण्यासाठी येणा-या अंदाजित खर्चास मान्यता देणेबाबत अंतर्गत रचना व विद्युत कामावरील खर्च

**महाराष्ट्र शासन**
**रोजगार व स्वयंरोजगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रोस्वरो-२०१४/प्र.क्र.२११/रोस्वरो-१**

जी.टी.हॉस्पीटल कॉम्प्लेस इमारत, ५ वा मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई -४०० ००१
तारीख: २७ ऑक्टोबर २०१४

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः रोजगार व स्वयंरोजगार विभाग, रोस्वरो-२०१२/प्र.क्र.३०९/रोस्वरो-१ दि.१९ मे,२०१४
२) शासन परिपत्रक क्रमांकःवित्त विभाग,क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दिनांक ०१ जुलै,२०१४
३) शासन निर्णय क्रमांकः रोजगार व स्वयंरोजगार विभाग, रोस्वरो-२०१२/प्र.क्र.३०९/भाग-२/रोस्वरो-१ दिनांक १६ जुलै,२०१४
४) शासन निर्णय क्रमांकः रोजगार व स्वयंरोजगार विभाग, रोस्वरो-२०१४/प्र.क्र.१०९/रोस्वरो-१ दि.२१ ऑगस्ट,२०१४
५) आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय यांचे पत्र क्र.रोस्वरो-९/सीजीसीसी/८६२५ दि.२६ ऑगस्ट,२०१४
६) शासन आदेश क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग क्र.आरओबी २०१४/प्र.क्र.६८/१८ (र. व का.) दि.०४ ऑक्टोबर,२०१४

**शासन निर्णय-**

उपरोक्त संदर्भाधिन शासन निर्णय दिनांक १९ मे,२०१४ अन्वये राज्यात रोजगार व स्वयंरोजगार केंद्रामध्ये व्यवसाय मार्गदर्शन व समुपदेशन केंद्रे स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आला असून पहिल्या टप्प्यात मुंबई उपनगर, औरंगाबाद, नागपूर, सांगली व सिंधुदुर्ग येथे अशी केंद्रे स्थापन करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. शासन निर्णय, रोजगार व स्वयंरोजगार विभाग दि.२१ ऑगस्ट,२०१४ अन्वये सदर योजनेसाठी रु.४,००,५१,८००/-( रु. चार कोटी एकावन्न हजार आठशे फक्त) एवढे अनुदान मंजूर करण्यात आले आहे. आयुक्त , रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास यांनी त्यांच्या दि.२६ ऑगस्ट ,२०१४ च्या पत्रानुसार कळविल्याप्रमाणे जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र, सिंधुदुर्ग येथे व्यवसाय मार्गदर्शन व समुपदेशन केंद्र स्थापन करण्यासाठी महाराष्ट्र राज्य लघु उद्योग विकास महामंडळ यांनी दिलेल्या अंदाजपत्रकानुसार अंतर्गत रचना व विद्युत या कामासाठी येणारा अंदाजित खर्च पुढील प्रमाणे आहे.

| अ.क्र. | अंदाजपत्रक सादर करणारी यंत्रणा | कामाचे स्वरुप | रक्कम रु. |
|---|---|---|---|
| १ | महाराष्ट्र राज्य लघु उद्योग महामंडळ | अंतर्गत रचना (इंटेरीअर) | रु.५८,७३,२०० (रु.अठ्ठावन लाख त्र्याहत्तर हजार दोनशे फक्त) |
| २ | | विद्युत | रु.१६,१७,६६५ ( रु.सोळा लाख सतरा हजार सहाशे पासष्ठ फक्त) |
| एकूण | | | रु.७४,९०,८६५ (रु. चौ-याहत्तर लाख नव्वद हजार आठशे पासष्ठ फक्त) |

२. या शासन निर्णयान्वये उपरोक्त रु.७४,९०,८६५ (रु.चौ-याहत्तर लाख नव्वद हजार आठशे पासष्ठ फक्त) एवढया अंदाजित खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत असून सदर खर्चास खालील अटींच्या अधीन राहून मंजुरी देण्यात येत आहे.

१. सदर काम शासनाच्या विहीत कार्यपध्दतीनुसार करण्यात यावे.

२. सदर काम निश्चित केलेल्या विनिर्दीष्टाप्रमाणे असल्याची खातरजमा केल्याखेरीज तसेच, त्यांच्या गुणवत्तेची खात्री पटल्याखेरीज त्याबाबतची पूर्ण रक्कम संबंधितांना प्रदान करण्यात येऊ नये.

३. उपरोक्त मंजूरी ही शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५ मे,२००९ नुसार, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८ मधील भाग-पहिला, उप विभाग-दोन अनु. क्रमांक ३८ नियम ९०(१) नुसार प्रशासकीय विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार देण्यात येत आहे.

४. सदर खर्च सन २०१४-१५ साठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व मागणी क्र.झेड ए-०१, प्रधान लेखाशीर्ष-२२३०- कामगार व सेवायोजन, ०२- सेवायोजन व ००१- सेवायोजन व प्रशासन, ०६- व्यवसाय मार्गदर्शन व समुपदेशन केंद्राची स्थापना, (२२३०६०३८) १३ कार्यालयीन खर्च (योजनांतर्गत) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०२७१५१९३५६९०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Usha Prakash Mahajan

Digitally signed by Usha Prakash Mahajan
DN: c=IN, o=Govt of Maharashtra, ou=Employment and self employment, postalCode=400032, st=maharashtra, cn=Usha Prakash Mahajan
Date: 2014.10.27 15:33:55 +05'30'

उ. प्र.महाजन
सह सचिव

प्रत,

१. मा.महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), एक, महाराष्ट्र,मुंबई
२. मा.महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), दोन, महाराष्ट्र , नागपूर
३. आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकण भवन,नवी मुंबई
४. वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई
५. नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. अपर कोषागार अधिकारी, उप कोषागार कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, सिंधदुर्ग
९. निवडनस्ती- रोस्वरो-१